सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील उत्कृष्ट निर्यातीचे कार्य करणा-या राज्यातील निर्यातदारांसाठी आयोजित निर्यात पुरस्कार वितरण कार्यक्रम व निर्यात प्रोत्साहन कार्यशाळा याकरीता निधी उपलब्ध करुन देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

## शासन निर्णय क्र.निर्यात-२०२२/ प्र.क्र.४७/ उद्योग-७

मंत्रालय, मुंबई-४००.०३२

दिनांक २४/०३/२०२२

**संदर्भ** :- १. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.इएक्सपी-१००२/प्र.क्र.२२१/उद्योग-१२, दि.२०/०१/२००३.

२. अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.उसं/ निप्रशा/ प्रशासकीय मंजूरी/ २०२२/ अे-१७९, दिनांक १७/०२/२०२२.

३. उद्योग सह संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/ निप्रशा/ निपुका-२०२२/२०२२/ अे-३९१, दिनांक १०/०३/२०२२.

४. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.निर्यात-२०२२/ प्र.क्र.४७/ उद्योग-७, दि.२१/०३/२०२२.

**प्रस्तावना:-**

राज्यातील निर्यातदारांना मान्यता प्राप्त व्हावी व त्यांनी केलेल्या निर्यातीच्या कामगिरीबद्दल त्यांचे कौतुक व्हावे आणि भविष्यकाळात निर्यातदारांनी गतकालापेक्षा अधिक भरीव कामगिरी करुन जास्तीत जास्त निर्यात करावी. तसेच निर्यात प्रचालनास हातभार लावावा या हेतूने राज्यातील निर्यातदारांना त्यांच्या निर्यातीच्या उत्कृष्ट कामगिरीबद्दल सन्मानचिन्हे आणि गुणवत्ता प्रमाणपत्रे समारंभपूर्वक होणेबाबतची योजना सन १९७१-७२ पासून विकास आयुक्त (उद्योग) यांचेमार्फत राबविली जाते. राज्यातील लघू व मध्यम उद्योजकांना उत्कृष्ट निर्यातीचे कार्य करणा-या निर्यातदारांची पारितोषिकांसाठी निवड करण्यासाठी दिनांक २०/०१/२००३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मा. प्रधान सचिव(उद्योग) यांचे अध्यक्षतेखाली निवड समिती गठीत करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने राज्य उत्कृष्ट निर्यात पुरस्कार सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील उत्कृष्ट निर्यातदारांच्या पुरस्कार निवडीबाबत मा. प्रधान सचिव(उद्योग) यांनी दिलेल्या निर्देशानुसार दिनांक ३०/१२/२०२० रोजी विकास आयुक्त (उद्योग) यांचे अध्यक्षतेखाली ऑनलाईन पध्दतीने बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीमध्ये सन २०१७-१८ या आर्थिक वर्षासाठी वेगवेगळ्या प्रवर्गातील ३४ निर्यातदारांची निवड करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने वर्ल्ड ट्रेड सेंटर, मुंबई येथे एकदिवसीय उत्कृष्ट निर्यात पुरस्कार वितरण कार्यक्रम व निर्यात प्रोत्साहन कार्यशाळा आयोजनाकरीता आवश्यक रुपये २२.५ लक्ष रकमेचा प्रशासकीय मंजूरी व निधी वितरण करण्याबाबतचा प्रस्ताव अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांनी त्यांच्या दिनांक १७/०२/२०२२ रोजीच्या पत्रान्वये सादर केला आहे. सदर प्रस्तावास दिनांक २१/०३/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने उक्त नमूद कार्यक्रम व कार्यशाळा आयोजनासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील उत्कृष्ट निर्यातदारांच्या पुरस्कारासाठी वेगवेगळ्या प्रवर्गातील ३४ निर्यातदारांची निवड करण्यात आली असून त्याअनुषंगाने वर्ल्ड ट्रेड सेंटर, मुंबई येथे आयोजित एकदिवसीय उत्कृष्ट निर्यात पुरस्कार वितरण कार्यक्रम व निर्यात प्रोत्साहन कार्यशाळा याकरीता आवश्यक रुपये २२,५०,०००/- (रुपये बावीस लक्ष पन्नास हजार फक्त) इतका निधी विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांना वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी आहरण व संवितरण करावयाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत आहेत.

३. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. अर्थसं २०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक २४/०६/२०२१ व त्यासोबतचे परिशिष्टातील तरतुदीनुसार तसेच त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून प्राप्त माहितीनुसार असे प्रमाणित करण्यात येते की, राज्यातील निर्यातदारांना त्यांच्या निर्यातीच्या उत्कृष्ट कामगिरीबद्दल सन्मानचिन्हे आणि गुणवत्ता प्रमाणपत्रे समारंभपूर्वक होणेबाबतची योजना सन १९७१-७२ पासून विकास आयुक्त (उद्योग) यांचेमार्फत राबविली जाते. राज्यातील लघू व मध्यम उद्योजकांना उत्कृष्ट निर्यातीचे कार्य करणा-या निर्यातदारांची पारितोषिकांसाठी निवड करण्यासाठी दिनांक २०/०१/२००३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मा. प्रधान सचिव(उद्योग) यांचे अध्यक्षतेखाली निवड समिती गठीत करण्यात आली आहे. सदर योजनेअंतर्गत प्राप्त झालेला निधी सेवा पुरवठादारांच्या प्राधिकृत बँक खात्यामध्ये थेट जमा होणार आहे. यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक/ महालेखापाल यांच्याकडून कोणतेही आक्षेप नाहीत. सदर निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता संबंधित पुरवठादारांना देयकापोटी खर्च केला जाणार आहे.

४. सदर कार्यक्रमासाठी होणारा खर्च मागणी क्र. के-७, २८५२- उद्योग, ८०० इतर खर्च, राज्य योजना (००) (०४), निर्यात प्रचालनाचे बळकटीकरण (कार्यक्रम) (२८५२ ०१५८), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी सदर कार्यक्रमाकरीता वितरीत करण्यात आलेल्या निधीसंदर्भातचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत शासनास सादर करावे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ-३ दिनांक ०६/०४/२०२१, दिनांक २४/०६/२०२१, दिनांक १४/१०/२०२१, दिनांक ०३/०२/२०२२ व त्यासोबतच्या परिशिष्टातील तरतुदीनुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.७९/ २०२२/ व्यय-१६, दिनांक १५/०३/२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०३२४१७५५००१०१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

RAJEEV VITTHAL RAJMANE

Digitally signed by RAJEEV VITTHAL RAJMANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=236eb645736d99439ecdba7a9ca089f1295797136f40d4172ad8740745981e39, pseudonym=5986A7EF7C4A5144BE154D090DDF15619B0872E6, serialNumber=9AF1A1281C6D8847D249FEF2488B7CAA84A3751E6EE91EBAA5CC0332D8B30060, cn=RAJEEV VITTHAL RAJMANE
Date: 2022.04.06 12:50:41 +05'30'

**(राजीव राजमाने)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-३२. (मूळ शाईच्या ५ प्रती)
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), नागपूर.

५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई.
७) लेखाधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-४०० ०३२.
८) वित्त विभाग (कार्यासन अर्थसंकल्प-१४/ व्यय-१६), मंत्रालय, मुंबई.
९) नियोजन विभाग (कार्यासन-१४६१), मंत्रालय, मुंबई.
१०) अवर सचिव ( कार्यासन प्रशासन-१), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (कार्यासन उद्योग-७).